**मराठवाडा क्षेत्रातील वृक्षाच्छादन वाढविण्यासाठी वृक्ष लागवड, संरक्षण व संगोपन याकरिता केंद्रीय संरक्षण विभागांतर्गत मराठवाडा विभागात हिंगोली व बीड येथे दोन इको-बटालियन स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः साववि-२०२३/प्र.क्र.११/फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : २७.०६.२०२३.

<u>वाचा</u>:-

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक साववि-२०१६/प्र.क्र.१२९/फ-११, दिनांक १३.१०.२०१६
२. संरक्षण विभाग, केंद्र शासन, यांचे क्रमांक ६८६४०/Eco/Raising/Two Addl Coys/TA-२/२०/D/(GS-III/A)दिनांक १८.०५.२०२३ रोजीचे पत्र.
३. डीटीई जनरल ऑफ स्टाफ ड्युटीस, जनरल स्टाप ब्रँच, भारतीय सेना, नवी दिल्ली यांचे क्रमांक -ए/५४०१२/टीए/इसीओ/एसडी-५/दिनांक २६.०५.२०२३ रोजीचे पत्र.

<u>प्रस्तावना</u>:-

राज्यातील एकूण भौगोलिक क्षेत्राच्या तुलनेत वनक्षेत्र जवळपास २० टक्के आहे. मराठवाड्याच्या एकूण ८ जिल्ह्यांमध्ये भौगोलिक क्षेत्राच्या तुलनेत वनाच्छादित क्षेत्राचे प्रमाण कमी आहे. मराठवाड्यात एकंदर पर्जन्यमान तसेच वृक्ष लागवडीसाठी लागणारी आवश्यक जमिनीची प्रत या दोन्ही बाबी प्रतिकूल असल्याने वृक्ष लागवडीसाठी विविध पर्याय विचारात घेणे आवश्यक आहे.

०२. मराठवाड्यातील दुष्काळावर आणि पाण्याच्या दुर्भिक्षावर प्रभावीपणे मात करावयाची असल्यास मराठवाड्यासाठी व्यापक वृक्ष लागवडीचा कार्यक्रम हाती घेणे आवश्यक आहे. त्यासाठी वन विभागाच्या उपलब्ध यंत्रणेमार्फत वृक्षाच्छादन (Tree Cover) आणि वनाच्छादन (Forest cover) वाढविण्यासाठी सातत्याने प्रयत्न करण्यात येत आहेत. परंतु, वृक्षारोपणाची आणि पुढील देखभाल आणि संगोपन याची व्याप्ती पाहता मोठ्या प्रमाणात मनुष्यबळ आणि तांत्रिक सहाय्य आवश्यक आहे. सदर बाब विचारात घेवून नमूद क्रमांक १ येथील दिनांक १३.१०.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये मराठवाडा विभागात इको-बटालियन अंतर्गत प्रथम टप्प्यात एका कंपनीची व त्यानंतर अनुभवांती अधिक कंपन्याची स्थापना टप्प्याटप्प्याने करण्यासाठी केंद्र शासनास सविस्तर प्रस्ताव पाठविण्यास

शासन मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने मराठवाड्यात वृक्ष लागवड करण्यासाठी हिंगोली व बीड या दोन जिल्ह्यामध्ये अतिरिक्त दोन कंपन्यांची स्थापना करण्याबाबत नियोजन विभाग व वित्त विभागाच्या मान्यतेने केंद्र शासनास दिनांक ३१.०३.२०२१ रोजीच्या पत्रान्वये विनंती करण्यात आली होती. त्यानुषंगाने वाचा येथे नमूद क्रमांक २ येथील दिनांक १८.०५.२०२३ रोजीच्या पत्रान्वये केंद्र शासनाच्या संरक्षण मंत्रालयाकडून मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यानुषंगाने मराठवाड्यातील हिंगोली व बीड येथे दोन इको बटालियनची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मराठवाड्यातील हिंगोली व बीड या दोन जिल्ह्यांमध्ये प्रत्येकी एक अशा एकूण दोन इको - बटालियनची स्थापना करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर दोन्ही बटालियनचा कालावधी हा प्रत्यक्ष स्थापनेपासून ५ वर्ष इतका असेल. सदर दोन्ही नव्याने स्थापन करावयाच्या इको बटालियन करीता उपरोक्त संदर्भ क्रमांक २ येथे नमूद संरक्षण मंत्रालय, केंद्र शासनाच्या दिनांक १८.०५.२०२३ रोजीच्या पत्रात नमूद केल्यानुसार आवश्यक ती कार्यवाही सक्षम प्राधिकाऱ्यांमार्फत करावी.

०२. तसेच सदर हिंगोली व बीड येथे स्थापन करावयाच्या दोन्ही इको-बटालियनची निर्मिती झाल्यानंतर सदर दोन्ही इको बटालियन मार्फत करण्यात येणारी वृक्ष लावगड, संगोपन आणि देखभाल इ. कामानुसार निधीची प्रतीपूर्ती खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली संबंधित वर्षाच्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. सी-०७**
**२४०६, वनीकरण व वन्यजीवन (राज्य) योजनांतर्गत योजना**
**११० वन्य जीव संरक्षण**
**इको टास्क फोर्स बटालियन (००)(२६) (२४०६ A२११)**
**५०- इतर खर्च**

०३. सदर शासन निर्णय वित्त विभाग व नियोजन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६२७१५१४४४२७१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAVIKIRAN
SABAJI GOVEKAR

Digitally signed by RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=b00b3ae6f82b447bdd60190209f1258e170f8f617d261f81e6281dfbfdf28c0d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B752370B557D0A3E58B4B069230BC54F6A13D04798D2EE7A3F1C7DCC5655271C, cn=RAVIKIRAN SABAJI GOVEKAR
Date: 2023.06.27 15:19:48 +05'30'

**( डॉ. रविकिरण गोवेकर )**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, यांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
८. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
९. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१०. सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य.
११. मा. मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२. सर्व मंत्रालयीन विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक (प्रादेशिक) (११ वृत्त)
१७. वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण (६ वृत्त)
१८. उप वनसंरक्षक (प्रा) (सर्व)/विभागीय वन अधिकारी (प्रा)/उपविभागीय वन अधिकारी (प्रा)

१९. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण (सर्व जिल्हे)
२०.महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
२१.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
२३.निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
२४.वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
२५.कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२६.कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२७.उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२८. निवडनस्ती फ-११.